**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, गोंदिया अंतर्गत मौजे मुरपार ता. जि. गोंदिया येथील भुमापन क्र.८,९ व ६/१ मधील १.४० हे. आर जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्यासाठी सुधारीत प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१२१६/प्र.क्र.५३५/परि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ सप्टेंबर २०१८

**वाचा :**

१) **गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमव्हीडी-१२१६/प्र.क्र.५३५/परि-४, दि.०७.११.२०१७**

२) **परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. ब्रेचाप (३५)/१११६/न.क्र.४८/का-१०(१) / जा.क्र. १३१३२, दि.०६.०९.२०१८**

**प्रस्तावना :**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, गोंदिया अंतर्गत मौजे मुरपार ता. जि. गोंदिया येथील भुमापन क्र.८,९ व ६/१ मधील १.४० हे. आर जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणीसाठी रु.३९,१३,९८०/- (अक्षरी रुपये एकोणचाळीस लक्ष तेरा हजार नऊशे ऐंशी फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणीच्या कामामध्ये दिरंगाई होत असल्याने दि.२९.०६.२०१८ रोजी अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली बैठक झाली. प्रत्यक्ष उपलब्ध झालेल्या जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅकची पातळी ही लगतच्या रस्त्याच्या पातळीपर्यंत ठेवण्याचे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, गोंदिया यांनी सूचवल्यामुळे ब्रेक टेस्ट ट्रॅकच्या भरावाची उंची वाढणार आहे. तसेच रिटेनिंग वॉलचे बांधकाम करणे व नाल्यावर मोरीचे बांधकाम करणे असे वाढीव काम होणार असल्याने सार्वजनिक बांधकाम विभागाने सुधारीत अंदाजपत्रक सादर करावे असे बैठकीमध्ये निश्चित करण्यात आले. त्यानुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केलेल्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, गोंदिया अंतर्गत मौजे मुरपार ता. जि. गोंदिया येथील भुमापन क्र.८,९ व ६/१ मधील १.४० हे. आर जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणीसाठी रु.३९,१३,९८०/- (अक्षरी रुपये एकोणचाळीस लक्ष तेरा हजार नऊशे ऐंशी फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दिलेली प्रशासकीय व वित्तीय मान्यता या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात

येत असून  उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, गोंदिया अंतर्गत मौजे मुरपार ता. जि. गोंदिया येथील भुमापन क्र.८,९ व ६/१ मधील १.४० हे. आर जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणीसाठी रु.६७,६९,३००/- (अक्षरी रुपये सदुसष्ट लक्ष एकोणसत्तर हजार तिनशे फक्त) इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामाचा खर्च उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No. | Particulars | Amount ( Rs.) |
|---|---|---|
| 1 | Cost of Work | 5683781.00 |
| 2 | Deduct 25.50 % As per Agreement B1/343/DL/2017-18 | -1449339.00 |
| | | 4234442.00 |
| 3 | Add cost of extra items (C.D. work and Protection Work) | 1360041.00 |
| | | 5594483.00 |
| 4 | Add 5% for Centage Charges | 279719.00 |
| 5 | Add 4% for Contengencies | 223775.00 |
| 6 | Add 12% for GST Provision | 671326.00 |

२. प्रस्तुत कामास दि.७.११.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता दिली असल्याने रु.३९,१३,०००/- एवढी रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागास यापूर्वीच वळती केली आहे. सबब, प्रस्तुत कामासाठी रु. २८,५६,३०३/- (रु.६७,६९,३०३/- वजा रु.३९,१३,०००/-) इतकी रक्कम अदा करण्यात यावी.

३. यासाठी येणारा खर्च मागणी क्र.बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०१)(०६) वाहन चालविण्यासाठी चाचणी घेताना गुणात्मक वाढ करण्याकरिता पायाभूत सोयीमध्ये दर्जावाढ करणे, कृत्रिम चाचणी पथ बांधणे (कार्यक्रमांवरील) (२०४१ ०३२१) १३-कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-एक, उपविभाग-५, अ.क्र.३ व सा.बां.विभाग नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ अ) नुसार असलेल्या अधिकारान्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२५१०५८१६८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.09.25 11:06:34 +05'30'

**(द.ह. कदम)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव

३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव

४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर

५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६. परिवहन उप आयुक्त (निरिक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई

७. प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर (ग्रामीण)

८. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,गोंदिया

९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया

१२. उप सचिव (इमा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

१४. निवडनस्ती (परि-४)